**<u>मागणी क्रमांक झेड एच-५ लेखाशिर्ष ४७०२ ए०२८,</u>**
**लघु पाटबंधारे तलाव मुठा ता. मालेगांव जि. वाशिम**
**(भूसंपादन निधी)**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भूसंपा-२०२४/प्र.क्र. ६७१ /जल-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २८ मार्च, २०२५.

**वाचा:** १) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१४/ प्र.क्र. ४१/ भाग-१/ अ-४, दिनांक ०३/११/२०१६, २३/०२/२०१७ व १३/०८/२०१८.
२) वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४.
३) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. असंलि/ २८४०/२०२४, दिनांक ०९/०८/२०२४.

**<u>प्रस्तावना</u>:** लघु पाटबंधारे तलाव मुठा ता. मालेगांव जि. वाशिम या योजनेकरिता संपादीत केलेल्या जमिनीच्या भूसंपादन प्रकरण क्र. ४७/४७/१९९६-९७ मधील एल.ए.आर.क्र. २०८/२०१३ या न्यायालयीन प्रकरणी मा. दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर), जि. वाशिम यांनी दिलेल्या आदेशानुसार वाढीव मोबदला अदा करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. त्यानुषंगाने प्रस्तुत न्यायालयीन प्रकरणात मा. दिवाणी न्यायालयाने दिलेल्या आदेशाविरुध्द वरिष्ठ न्यायालयात अपील न करण्याबाबत अभिप्राय असल्याने संदर्भीय क्र. ३ येथील प्रस्तावावर खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>निर्णय</u> :** लघु पाटबंधारे तलाव मुठा ता. मालेगांव जि. वाशिम या योजनेकरिता संपादीत केलेल्या जमिनीच्या भूसंपादन प्रकरण क्र .४७/४७/१९९६-९७ मधील वरील नमुद एल.ए.आर. संदर्भात संदर्भीय अ.क्र. ३ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने व्याजाच्या परिगणनेसह रुपये ३.४५ लक्ष (अक्षरी रुपये तीन लक्ष पंचेचाळीव हजार फक्त) निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन वितरित करण्यात येत आहे.

**अ)** वरील प्रकल्पाच्या भूसंपादनाकरिता अन्य स्त्रोतांकडून निधी उपलब्ध झाला असल्यास याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या रक्कमांचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये,
**ब)** तसेच भूसंपादन प्रयोजनार्थ उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या वरील निधीची गरज नसल्यास, सदर निधी कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य प्रयोजनार्थ वितरित करण्यात येवू नये.
**क)** कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पीत करावी.
**ड)** निधी वितरणासंबंधीच्या वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक २५/०७/२०२४ च्या परिपत्रकामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करावे.

२. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

**३.** यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेड एच-५,

४७०२- लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च,

(००), (१०१), भूपृष्ठ जल

(०१) लहान पाटबंधारे,

(०१) (०२) लहान पाटबंधारे योजना, १०१ ते २५० हे.सि. क्षमता (कार्यक्रम) (४७०२ ए०२८),

५३, मोठी बांधकामे

**४.** वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरित प्रती अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेक्षिक क्षेत्र, नागपूर आणि शासनास सादर कराव्यात.

**५.** याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांची राहील व अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेक्षिक क्षेत्र, नागपूर हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

**६.** प्रस्तुत आदेश, प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०३२८१७१२३९५४२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार वा नावाने.

RAJESH
HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.28 17:13:24 +05'30'

**( रा. हे. बागडे )**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रति,

१) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर.

२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती.

३) उप जिल्हाधिकारी (भूसंपादन) न.१, वाशिम.

४) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, वाशिम.

५) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.

७) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

८) निवड नस्ती, कार्यासन जल- ४.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. विरोधी पक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधीत लघु सिंचन (जलसंधारण) उपविभागीय अभियंता)
५. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांचे स्वीय सहायक)
६. आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.